**नांदेड शहरातील मदिना नगर येथील मदिना तुल उलूम शाळेजवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगर पालिकेच्या भूखंडावर उर्दू घर बांधण्यात आलेल्या उर्दू घराच्या दुरस्तीचे काम आणि अतिरिक्त कामाच्या रु.३८,४७,७०६/- (रुपये अडतीस लाख सत्तेचाळीस हजार सातशे सहा मात्र) किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नाउघ २०१८/प्र.क्र.१९४/कार्या-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: १६ ऑक्टोंबर, २०१८

**वाचा**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांकः नाउंघ २०१३/प्र.क्र.१२६/का.४ दि.४ फेब्रुवारी, २०१४.
२) जिल्हाधिकारी,नांदेड यांचे अ.शा.पत्र क्र२०१८/सा.शा.१/४७०१८, दि.१७.७.२०१८
३) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांचे पत्र क्रमांकः २८११, दि.०५.०७.२०१८.

**प्रस्तावना**

मदिना नगर, नांदेड येथील मदिना तुल उलूम शाळे जवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगर पालिकेच्या मालकीच्या भूखंडावर उर्दू घर बांधण्याच्या रु.८,१६,००,०००/- ( रुपये आठ कोटी सोळा लक्ष फक्त) इतक्या किंमतीच्या प्रस्तावास उपरोल्लेखित संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. तथापि, नांदेड उर्दू घराच्या नुकसानीसाठी व उर्दू घराच्या किरकोळ कामासाठी जिल्हाधिकारी, नांदेड आणि कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड यांनी त्यांच्या वरील संदर्भ क्र.२ व ३ येथील पत्रान्वये अंदाजपत्रक शासनाच्या मान्यतेसाठी सादर केले होते. सदर अंदाजपत्रकाची सार्वजनिक बांधकाम विभागाकडून छाननी करुन घेण्यात आली असता त्या विभागाने सदर कामाच्या रु.३८,४७,७०६/- (रुपये अडतीस लाख सत्तेचाळीस हजार सातशे सहा मात्र) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास सहमती दिलेली आहे. त्यानुसार मदिना नगर, नांदेड येथील मदिना तुल उलूम शाळे जवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगर पालिकेच्या मालकीच्या भूखंडावर उर्दू घराच्या नुकसानीसाठी व उर्दू घराच्या किरकोळ कामासाठी रु.३८,४७,७०६/- (रुपये अडतीस लाख सत्तेचाळीस हजार सातशे सहा मात्र) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मदिना नगर, नांदेड येथील मदिना तुल उलूम शाळे जवळील सर्वे नं.१२६९२ येथील महानगर पालिकेच्या मालकीच्या भूखंडावर उर्दू घराच्या नुकसानीसाठी व उर्दू घराच्या किरकोळ कामासाठी , पुढील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या तपशिलानुसार, रु.३८,४७,७०६/- (रुपये अडतीस लाख सत्तेचाळीस हजार सातशे सहा मात्र) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे -

| अ.क्र. | बाब | खर्च (रुपयात) |
|---|---|---|
| **अ)** | **दुरुस्ती काम** | |
| १ | बांधकाम खर्चाची एकूण रक्कम (A) | ३,६८,०१९.०० |
| २ | फर्निचर खर्च | ५,९०,०६२.०० |
| ३ | विद्युतीकरण खर्च | ५,००,०००.०० |
| | **एकूण** | **१४,५८,०८१.००** |
| ४ | १२% प्रमाणे GST अधिभार | १,७४,९७०.०० |
| ५ | किरकोळ खर्च | ५८,३२४.०० |
| | **एकूण** | **१६,९१,३७५.००** |
| **ब)** | **अतिरिक्त काम** | |
| ६ | बांधकाम (क्लासरुम मध्ये False Celling चे प्रोव्हीजन करणे, इमारतीच्या मागील बाजुस पेव्हर ब्लॉक्स बसविणे,स्टोअर रुमचे प्रोव्हीजन करणे, सरंक्षण भिंतीवर फेन्सीग करणे. | १८,४२,८०६.०० |
| ७ | बांधकामावरील रॉयलटी आणि Q.C. charges | १६,१००.०० |
| ८ | अधि १२% GST | २,२३,०६९.०० |
| ९ | अधि ४% किरकोळ खर्च | ७४,३५६.०० |
| | **एकूण** | **२१,५६,३३१.००** |
| | **एकूण (अ+ब)** | **३८,४७,७०६.००** |

२. जिल्हाधिकारी, नांदेड यांनी नांदेड उर्दू घराच्या दुरुस्तीचे काम व अतिरिक्त काम उपरोक्त रु.३८,४७,७०६/- (रुपये अडतीस लाख सत्तेचाळीस हजार सातशे सहा मात्र) इतक्या रकमेत पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

३ सदर प्रकरणी होणारा खर्च मागणी क्रमांक झेडई-१ - २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण - २०० - इतर कार्यक्रम - राज्य योजनांतर्गत योजना - (००) - (००) (१८) - उर्दु घरासाठी सहायक अनुदाने (२२३५ ए ५५२) या लेखा शिर्षाखाली टाकण्यात यावा व त्याखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग अनौ.संदर्भ क्र.४३३/१८/इमा-२, दि.१२.१०.२०१८ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन आणि सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०१८१०१६१७०६३१८८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2018.10.17 12:06:49 +05'30'

**(म.स.चौकेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी, नांदेड,
४. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड,
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग,नांदेड,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड,
८. अधीक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई,
९. खाजगी सचिव, मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (अ.वि.वि.) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. स्वीय सहायक, सह सचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. स्वीय सहायक, उप सचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. वित्त विभाग / नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.